**सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षामध्ये मागणी क्रमांक व्ही-२, मुख्यलेखाशीर्ष २८५१-सहकार ११०, उपलेखाशिर्ष-(०१) (०२) गटपातळीवरील ग्रामिण कारागीर (बलुतेदार) (अनिवार्य) (२८५१००२१) या लेखाशीर्षाअंतर्गत "०१- वेतन" या उद्दिष्टांमध्ये (२४२५००११) (२४२५०२२७) व (२४२५००६७) या लेखाशिर्षातील इतर उद्दिष्टांमधून पुनर्विनियोजनाने निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
शासन निर्णय, क्रमांक : अर्थसं-२०२२/प्र.क्र.२४/९-स,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय(वि),मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३१ मार्च, २०२२.

**संदर्भ** :- १.सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रं. अंवनि/६-सआ/२०२१-२२/अनुदान वाटप/पुर्नविनियोजन /२८५१००२१/ २०२२/३४३, दिनांक १७.०३.२०२२.
२.सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्रमांक : पुनर्वि-२३२२/ प्र.क्र.(१६/२०२२)/१७-स, दिनांक ३१.०३.२०२२

**प्रस्तावना :**

सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षामध्ये मुख्यलेखाशीर्ष २८५१, उपलेखाशिर्ष-(०१) (०२) गटपातळीवरील ग्रामिण कारागीर (बलुतेदार) अनिवार्य (२८५१००२१) या लेखाशीर्षाअंतर्गत "०१- वेतन" या उद्दिष्टांतर्गत निधी पुरेसा नसल्यामुळे काही अधिकारी/ कर्मचारी यांचे माहे फेब्रुवारी, २०२२ चा पगार अदा करण्यासाठी पुनर्विनियोजनाने निधी उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन होती. त्यानुसार संदर्भाधीन २ च्या शासन निर्णयानुसार दिलेली मान्यता विचारात घेऊन खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

या विभागाच्या अधिपत्याखालील सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे कार्यालयासाठी सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षामध्ये मागणी क्रमांक व्ही-२, मुख्यलेखाशीर्ष २८५१, उपलेखाशिर्ष-(०१) (०२) गटपातळीवरील ग्रामिण कारागीर (बलुतेदार) अनिवार्य (२८५१००२१) या लेखाशीर्षाअंतर्गत "०१- वेतन" या उद्दिष्टांमध्ये निधीची आवश्यकता असल्यामुळे लेखाशीर्ष (२४२५००११) "५०-इतर खर्च" या उद्दिष्टाअंतर्गत बचत होणाऱ्या निधिमधून रुपये ५.१५ लाख, लेखाशिर्ष (२४२५ ०२२७) "११-देशांतर्गत प्रवास खर्च" या उद्दिष्टाअंतर्गत बचत होणाऱ्या निधी मधून रुपये २.२१ लाख व लेखाशिर्ष (२४२५ ००६७) "११-देशांतर्गत प्रवास खर्च" या उद्दिष्टाअंतर्गत बचत होणाऱ्या निधिमधून रुपये १.४७ लाख असे एकूण रुपये ८.८३ लाख (अक्षरी रुपये आठ लाख त्रयांऐंशी हजार फक्त)

इतकी रक्कम पुनर्विनियोजनाद्वारे लेखाशीर्ष २८५१ ००२१ मधील “०१-वेतन” या उद्दिष्टाअंतर्गत बीडीएस प्रणालीवर उपलब्ध करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २३४/२०२२/व्यय-२, दिनांक ३१.०३.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या बेवसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०३३१२३४५३१५००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Shilpa Dilip Gaikwad
Date: 2022.03.31 23:47:45 +05'30'

**( शि.दि.गायकवाड )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर १/२
२.महालेखापाल (लेखापरिक्षा), महराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर १/२
३.सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४.विभागीय सह निबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण) नाशिक विभाग, नाशिक
५.जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
६.जिल्हा उपकोषागार अधिकारी, संगमनेर, जि.अहमदनगर
७.वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
८.अवर सचिव (१७-स),सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९.निवड नस्ती (९-स)